2011020815010100

राज्यातील महानगरपालिकेच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १००९/ प्रक्र ३५५/नवि २६
दिनांक : १० ऑगस्ट,२००९

शासन निर्णय:-

शासकीय / निमशासकीय कार्यालयातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे शिफारशी लागू करण्याचा राज्य शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार पाचव्या वेतनआयोगाप्रमाणे लागू झालेल्या अनेक वेतनश्रेण्यांचे पुर्नविलोकन करुन आता केवळ सहा वेतनश्रेण्या ग्रेडपेसह सहाव्या वेतन आयोगानुसार लागू केल्या आहेत. तसेच काही महानगरपालिकांनी देखील आपली आर्थिक स्थिती विचारात घेवून राज्य शासनाने स्विकारलेल्या सहाव्या वेतनआयोगाच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यामुळे इतर महानगरपालिकांमध्ये देखील त्याच धर्तीवर सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यासाठी मागणी केली जात आहे, हे लक्षात घेवून राज्यातील महानगरपालिकांमध्ये ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेण्या लागू करण्यास खालील अटींस अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) संबंधित महानगरपालिकेने सुरू केलेल्या विकास कामांसाठी पुरेशा प्रमाणात निधी उपलब्ध राहील याची काळजी घ्यावी, जेणेकरुन महानगरपालिकेला आपल्या हिश्श्याची तरतूद उपलब्ध करुन देण्यास कोणतीही अडचण होणार नाही अथवा त्याकरिता शासनाकडून अनुदान दिले जाणार नाही

ब) संबंधित महानगरपालिकेने विकास कामांसाठी घेतलेले कर्ज व त्यावरील व्याज यांची नियमीतपणे परतफेड करण्यासाठी पुरेसा निधी शिल्लक राहील याची खात्री करावी.

क) संबंधित महानगरपालिकेने त्यांचा आस्थापना खर्च हा ३५% पेक्षा या विहित मर्यादेपेक्षा जास्त होत नाही, याची देखील पडताळणी करणे आवश्यक राहील.

ड) शासनाने संवर्गनिहाय ५ व्या वेतन आयोगावेळीच्या वेतन श्रेणी विचारात घेवून, ज्याप्रमाणे ६ व्या वेतन आयोगाच्या सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या आहेत, त्याप्रमाणे महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्यांना सुधारीत वेतन श्रेणी लागू होतील आणि महानगरपालिकेमधील ज्या संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या / अधिकाऱ्यांच्या वेतनश्रेण्या ५ व्या वेतन आयोगावेळी जशा मंजूर असतील त्या वेतन श्रेण्यांना समांतर अशाच सुधारीत वेतनश्रेण्या ६ व्या वेतन आयोग प्रसंगी देखील देण्याची दक्षता घेण्यात यावी. यावेळी सुधारीत वेतनश्रेणीत महानगरपालिका कोणतीही वाढ करणार नाही.

इ) संबंधित महानगरपालिकेने ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणीचा लाभ केवळ महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील मंजूर पदांवर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना दिला जाईल याची दक्षता घ्यावी.

फ) महानगरपालिकेच्या अर्थसंकल्पात तरतूद करुन ६ वा वेतन आयोग लागू करण्याचा निर्णय घेण्यात येईल.

ग) ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारित वेतनश्रेणी विचारात घेवून राज्य शासन ज्याप्रमाणे थकबाकीची रक्कम देणार आहे त्याच धर्तीवर महानगरपालिका कर्मचाऱ्यांना / अधिकाऱ्यांना थकबाकी द्यावयाची झाल्यास महानगरपालिकेची आर्थिक स्थिती विचारात घेवून, वर नमूद केलेल्या उत्तरदायित्वाची रक्कम वेळीच देणे शक्य असल्यासच थकबाकी देण्याची दक्षता घेण्यात यावी.

ह) वरील सर्व बाबी विचारात घेवून महासभेच्या मान्यतेने ६ व्या वेतन आयोगाबाबत महापालिका प्रशासनाने निर्णय घेण्यात यावा.

२. वरील अटींचे पालन कटाक्षाने केले जाईल व महानगरपालिकेची आर्थिक शिस्त अबाधित राहील याची दक्षता घेवून संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांनी राज्य शासनाने स्विकारलेल्या ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेण्या महानगरपालिकेच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना लागू करण्याबाबत निर्णय घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(म.दि.आडिवरेकर)
शासनाचे सहसचिव

प्रत:

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
२. मा.राज्यमंत्री, नगरविकास यांचे सचिव
३. सचिव, नगर विकास विभाग यांचे स्टाफ ऑफिसर,
४. आयुक्त सर्व महानगरपालिका
५. नगर विकास विभागातील सर्व अधिकारी (१९) २०/२१/२२/२३/२४/२५/२६/२८/
६. निवडनस्ती नवि-२६